## आदिवासी विकास विभाग

मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२, दिनांक १६ मे २००६

### अधिसूचना

**भारताचे संविधान.**

क्रमांक आस्था.१०९८/प्र.क्र. १०३/का.१५.— भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद ३०९ खालील परंतुकान्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करून महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे महाराष्ट्र शासनाच्या आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारीमधील संचालनालयातील वरिष्ठ संशोधन अधिकारी, गट-अ पदांच्या सेवाभरतीचे विनियमन करणारे पुढील नियम करीत आहेत जसे :—

१. या नियमांना वरिष्ठ संशोधन अधिकारी, गट-अ (आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संचालनालयातील) या पदाचे (सेवाप्रवेश) नियम, २००६ असे संबोधण्यात यावे.

२. या नियमांमध्ये संदर्भानुसार दुसरा अर्थ अभिप्रेत नसेल तर,—

(अ) " आयोग " म्हणजे महाराष्ट्र लोकसेवा आयोग.

(ब) " पदवी " म्हणजे सांविधिक विद्यापिठाची पदवी.

(क) " विभाग " म्हणजे महाराष्ट्र शासनाचा आदिवासी विकास विभाग.

(ड) " शासन " म्हणजे महाराष्ट्र शासन.

(ई) " संचालनालय " म्हणजे आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था.

३. वरिष्ठ संशोधन अधिकारी या पदावरील नेमणुका पुढीलपैकी कोणत्याही मार्गाने करता येतील.—

(अ) आदिवासी विकास आयुक्तालयातील सहायक प्रकल्प अधिकारी, संशोधन अधिकारी, प्रशासकीय अधिकारी आणि अधिव्याख्याता गट-ब मधील पद धारण करणाऱ्या व त्या संवर्गात तीन वर्षांपेक्षा कमी नाही इतकी नियमित सेवा पूर्ण केलेल्या पात्र व्यक्तीमधून ज्येष्ठता अधीन पात्रता या आधारावर पात्र ठरविलेल्या योग्य व्यक्तींच्या पदोन्नतीने, किंवा

(ब) पुढील अटी पूर्ण करणाऱ्या उमेदवारांमधून नामनिर्देशनाने,—

(एक) ज्यांचे वय ३५ वर्षांपेक्षा जास्त नाही :

परंतु अगोदरच शासन सेवेत कार्यरत असलेल्या उमेदवारांच्या बाबतीत वयोमर्यादा पाच वर्षांनी शिथिलक्षम राहील.

(दोन) जे समाजशास्त्र किंवा मानववंशशास्त्रामधील पदव्युत्तर पदवी शैक्षणिक अर्हता धारण करीत आहेत :

परंतु समाजशास्त्र किंवा मानववंशशास्त्रामध्ये एम.फील. किंवा पीएच.डी. केलेल्या उमेदवारांना प्राथम्यक्रम राहील,

(तीन) ज्याने वरील उप खंड (दोन) मध्ये नमूद केलेली अर्हता संपादन केल्यानंतर आदिवासी, समाजकल्याण किंवा आदिवासी संशोधन यामधील तीन वर्षांपेक्षा कमी नाही इतक्या कालावधीचा प्रत्यक्ष अनुभव मिळविलेला आहे,

(चार) ज्यांना मराठी भाषेचे पर्याप्त ज्ञान आहे :

परंतु आणखी असे की, अपवादात्मक शैक्षणिक अर्हता धारण करणाऱ्या उमेदवारांच्या बाबत आयोगाच्या शिफारशीनुसार कमाल वयोमर्यादा आणि अनिवार्य अनुभवाची अट शासनास शिथिल करता येईल.

४. या नियमांमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी मागासवर्गीयांसाठी राखून ठेवलेली नामनिर्देशनाच्या कोट्यातील पदे भरण्यासाठी मुलभूत उच्चस्तर शैक्षणिक अर्हता आणि अनुभव धारण करणारे पुरेशे उमेदवार उपलब्ध होत नाहीत असे निवडीच्या कोणत्याही टप्प्याला जर आयोगाचे मत झाले तर आयोगाला अशा निवडीच्या बाबतीत अनुभव कालावधी याबाबतची अट प्रसंगी शिथिल करता येईल आणि अशा जाती किंवा जमातीचे पात्र उमेदवारांची निवड करता येईल.

५. या पदावरील नेमणुका पदोन्नती व नामनिर्देशनाने ५० : ५० या प्रमाणात करण्यात येतील.

६. या पदावर नामनिर्देशनाने नियुक्त केलेली व्यक्ती दोन वर्षांच्या परिविक्षाधीन कालावधीवर असेल. परिविक्षाधीन कालावधी जास्तीत जास्त एक वर्षासाठी वाढविता येईल. या पदावर नियुक्त केलेली व्यक्ती जर ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर विहित परिविक्षाधीन कालावधीमध्ये संबंधित पदासाठी विहित केलेले प्रशिक्षण पूर्ण करावे लागेल आणि विहित केलेली विभागीय परीक्षा उत्तीर्ण करावी लागेल. तसेच परिविक्षाधीन कालावधी यशस्वीरित्या पूर्ण करावा लागेल :

परंतु ती व्यक्ती विहित कालावधीत परिविक्षा कालावधी यशस्वीरित्या पूर्ण करू शकली नाही अथवा विभागीय परीक्षा उत्तीर्ण होऊ शकली नाही अथवा ती त्या पदाकरिता योग्य नसल्याचे आढळले तर पूर्वसूचना न देता तिला सेवेतून काढून टाकण्यास ती पात्र ठरेल.

७. या पदावर नियुक्त केलेली व्यक्ती जर ती अगोदरच उत्तीर्ण झाली नसेल किंवा तिला उत्तीर्ण होण्यापासून सूट मिळाली नसेल तर, त्या पदासाठी विहित केलेली हिंदी व मराठी भाषा त्यासंबंधी केलेल्या नियमांनुसार उत्तीर्ण करणे आवश्यक राहील.

८. या पदावर नियुक्त होणाऱ्या व्यक्तीला महाराष्ट्र शासनाच्या माहिती तंत्रज्ञान संचालनालयाने वेळोवेळी विहित केलेले संगणक हाताळणी/वापराबाबतचे प्रमाणपत्र धारण करणे आवश्यक राहील.

९. या पदावर नियुक्त केलेली व्यक्ती महाराष्ट्र राज्यात कोणत्याही ठिकाणी बदली करण्यास पात्र राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**भा. ई. नगराळे,**
शासनाचे सचिव.

## TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT

Mantralaya Annexe, Mumbai 400 032, dated the 16th May 2006

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

No. EST.1098/CR-103/D-XV.— In exercise of the powers conferred by the proviso to Article 309 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to make the following Rules regulating recruitment to the post of Senior Research Officer, Group-A in the Directorate of Tribal Development under the Tribal Development Department of Government of Maharashtra, namely :—

1. These rules may be called the Senior Research Officer, Group-A (in the Directorate of Tribal Research and Training Institute) (Recruitment) Rules, 2006.

2. In these rules, unless the context requires otherwise,—

(*a*) "Commission" means the Maharashtra Public Service Commission.

(*b*) "Degree" means a degree of a statutory University.

(*c*) "Department" means the Tribal Development Department of Government.

(*d*) "Directorate" means the office of Director, Tribal Research and Training Institute of Tribal Development.

(*e*) "Government" means the Government of Maharashtra.

3. Appointment to the post of Senior Research Officer shall be made either,—

(*a*) by promotion of a suitable person from the Commissionerate of Tribal Development, on the basis of Seniority subject to fitness from amongst the persons holding the post of Assistant Project Officer, Research Officer, Administrative Officer and Lecturer, Group-B, having not less than three years regular service in that post, or

(*b*) by nomination from amongst the candidates who,—

(*i*) are not more than 35 years of age :

provided that the age limit may be relaxed upto 5 years in case of candidates who are already working in Government service.

(*ii*) possess a Post-Graduate degree in Social Sciences or Anthropology :

provided that preference may be given to candidate who possess M.Phil. or Ph.D. in Social Science or Anthropology, and

(*iii*) possess practical experience for a period of not less than three years in any field of tribal, social welfare or tribal research, gained after acquiring the qualifications mentioned in sub-clause (*ii*).

(*iv*) have adequate knowledge of Marathi :

provided further that, the upper age limit and required experience may be relaxed by Government on the recommendation of the Commission in favour of candidates having exceptional qualifications.

4. Notwithstanding anything contained in these Rules, if at any stage of selection, the Commission is of the opinion that sufficient number of candidates possessing the requisite higher basic academic qualification and experience are not available to fill up the vacancies reserved for candidates belonging to Backward Class, then the Commission may in the matter of such selection relax the period of experience set out therein and select suitable candidates belonging to such castes or tribes.

5. Appointment to the post by promotion and nomination shall be made in ratio 50:50.

6. A person appointed by nomination to the post shall be on probation for a period of two years. Probation period may be extended maximum upto one year only. Person appointed to the post shall be required to undergo such training and pass such departmental examination that may be prescribed for the post within prescribed period; unless he has already passed those examination or has been exempted from passing the same :

provided that if the person does not pass the prescribed departmental examination or does not complete the probation successfully or is not found to be suitable for the post during the probation period, the person shall be liable to be terminated from service without prior notice.

7. A person appointed to the post shall be required to pass the examinations in Hindi and Marathi according to the Rules made in that behalf unless the person has already passed or has been exempted from passing those examinations.

8. Person appointed to the post shall possess the certificate in computer operation prescribed by Directorate of Information Technology, Government of Maharashtra from time to time.

9. A person appointed to the post shall be liable for transfer anywhere in the State of Maharashtra.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

B. I. NAGARALE,
Secretary to Government.

---

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई